**वितरण आदेश क्रमांक: २**
**कोषागारातून रोख रक्कम देय अनुदान**
**सन २०१९-२०२०.**

**चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या जनरल बेसिक ग्रँटच्या दुसऱ्या हप्त्याचे वितरण.**

# महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१८/प्र.क्र.१४९/ वित्त-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
तारीख: २५ नोव्हेंबर ,२०१९.

वाचा -

१. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.२६/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १६/७/२०१५.
२. शासन निर्णय क्रमांकः जीपीडीपी-२०१५/प्र.क्र.३८/ पंरा-६ ,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ४ /११/२०१५.
३. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१५/प्र.क्र.२६/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २१ /१२/२०१५.
४. शासन निर्णय क्रमांकः संग्राम-२०१५/प्र.क्र.९३/संग्राम कक्ष,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ११ /८/२०१६.
५. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१६/प्र.क्र.१४४/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ३१ /८/२०१६.
६. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१६/प्र.क्र.१४४/ वित्त-४,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक २ /१/२०१७.
७. शासन निर्णय क्रमांकः वीदेव-२०१८/प्र.क्र.१०/ ऊर्जा-५, उद्योग ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १६ /५/२०१८.
८. शासन निर्णय क्रमांकः चौविआ-२०१८/प्र.क्र.१४९/ वित्त-४,ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ८/८/२०१९.
९. केंद्र शासनाचे पत्र क्र. F.१३ (०१)/FCD/२०१९ दि.१६ नोव्हेंबर, २०१९.

**प्रस्तावना -**

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरित करण्यासाठी सन २०१९-२० च्या जनरल बेसिक ग्रँटच्या दुसऱ्या हप्त्यापोटी रु.२०२९७७.५० लक्ष इतका निधी मुक्त केला असल्याचे वित्त आयोग कक्ष, वित्त विभाग मंत्रालय,मुंबई-३२ त्यांनी त्यांच्या दिनांक १८ नोहेंबर, २०१९ रोजीच्या पत्रान्वये कळविले आहे.

उद्योग ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय यांनी दि.१६ मे, २०१८ रोजी शासन निर्णय निर्गमित केला असून त्यात असे नमूद केले आहे की, जिल्हा परिषद /महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/ ग्रामपंचायतीकडील पाणीपुरवठा वीज थकबाकीच्या दि.३१ मार्च २०१८ पर्यंतच्या थकीत बिलाच्या रक्कमेपैकी (दंड व व्याज कमी करुन) ५०% रक्कम वित्त आयोगाच्या निधी मधून ग्रामविकास विभागाने महावितरण कंपनीस थेट अदा करावी. उर्वरीत ५०% रक्कम संबंधित जिल्हा परिषद/ महाराष्ट्र जीवन प्राधिकरण/ग्रामपंचायत यांनी महावितरण कंपनीकडे भरावी. त्यानुसार १४ व्या वित्त आयोगाकडून राज्य शासनास मिळालेल्या निधीपैकी २५% रक्कम महावितरण कंपनीस देण्याबाबत व उर्वरीत ७५% अनुदान राज्यातील ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करावयाचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासनाने खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -**

चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगाचा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचा जनरल बेसिक ग्रँटच्या दुसऱ्या हप्त्याचा केंद्र शासनाकडून मुक्त करण्यात आलेला रु.२०२९७७.५० लक्ष इतक्या निधीपैकी महावितरणाच्या उर्वरित रु.११११७३.०० लक्ष इतका निधी संदर्भाधीन शासन निर्णय क्र.७, दि.१६/५/२०१८ अन्वये जिल्हा परिषद/महाराष्ट्र जीवन प्राधीकरण/ ग्रामपंचायतीकडील पाणीपुरवठा वीज थकबाकी/ग्रामपंचायतीकडील पथदिव्यांवरील वीज थकबाकीच्या दि.३१ मार्च,२०१८ पर्यंतच्या ( दंड व व्याज कमी करून ) मुळ थकबाकीच्या रक्कमा भागविण्याकरीता महावितरण कंपनीस त्यांच्या क्र.पी-कॉम/ लेखा/ शासन थकबाकी/०१३६१४, दि.१/६/२०१८ च्या पत्राच्या अनुषंगाने अदा करण्यात येत आहे. याबाबत स्वतंत्र ज्ञापन निर्गमित करण्यात येत आहे.

२. तसेच उर्वरीत रक्कम रु.१९१८०४.५० लक्ष इतका निधी संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ दि.१६/७/२०१५ च्या शासन निर्णयान्वये विहीत i) लोकसंख्या ii ) क्षेत्रफळ या निकषाआधारे यथायोग्य घटीत सर्व ग्रामपंचायतींना वितरीत करण्यासाठी सोबतच्या विवरणपत्रात ( प्रपत्र अ ) दर्शविल्याप्रमाणे सर्व जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीव्दारे ( बीम्सवर ) वितरीत करण्यात येत आहे.

३. चौदाव्या केंद्रिय वित्त आयोगांतर्गत केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचनांनुसार प्राप्त संपूर्ण अनुदान ग्रामपंचायतींना वितरीत करावचे आहे. त्याकरीता जिल्हा परिषदेच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या बीम्सवर वितरीत करण्यात आलेला निधी त्यांनी तात्काळ कोषागारातून काढून प्रस्तुत संपूर्ण निधी ,विहित केलेल्या निधी वाटपाच्या निकषांच्या आधारे त्यांच्या अधिनस्त सर्व ग्रामपंचायतींना इ.सी.एस.(Electronic Clearance System)/एन.इ.एफ.टी (National Electronic Fund Transfer) किंवा आर.टी.जी.एस (Real Time Gross Settlement) या आधुनिक बँकिंग सिस्टीमद्वारे संबंधित ग्रामपंचायतींच्या खात्यावर पाच ते दहा दिवसांच्या आत तातडीने वर्ग करावा. याप्रमाणे निधी वितरीत करण्यास विहीत कालावधीपेक्षा जास्त विलंब लागल्यास त्या विलंबाबाबत भारतीय रिझर्व बँकेच्या दराने ग्रामपंचायतींना व्याज देणे संबंधित जिल्हा परिषदेस बंधनकारक राहील, याची नोंद घ्यावी. संपूर्ण निधी विहित निकषानुसार सर्व ग्रामपंचायतींना

वितरीत करून त्याबाबतचे प्रमाणपत्र सोबत जोडलेल्या “प्रपत्र -ब” नुसार मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी शासनास तातडीने सादर करावे.

४. ग्रामपंचायतींनी, चौदाव्या वित्त आयोगाचा निधी यापूर्वी दिलेल्या सूचनांनुसार चौदाव्या वित्त आयोगांतर्गत प्राप्त निधीच्या व्यवहारासाठी उघडलेल्या बँकेच्या स्वतंत्र बचत खात्यातच ठेवावा.

५. शासनाने दिलेल्या मार्गदर्शक सूचनांनुसार ग्रामपंचायत स्तरावरील निधीच्या वितरणाचे नियोजन, सनियंत्रण व समन्वयनाची जबाबदारी उपमुख्य कार्यकारी अधिकारी (ग्रामपंचायत) यांची राहील.

६. चौदाव्या वित्त आयोगाच्या सन २०१५-१६ या पहिल्या आर्थिक वर्षाच्या ग्रामीण स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत केलेल्या अनुदानातून घ्यावयाची कामे, त्याचे नियोजन यासंदर्भातील मार्गदर्शक सूचना संदर्भाधीन दि.२१ डिसेंबर, २०१५ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत. तसेच सन २०१६-१७ या आर्थिक वर्षापासूनच्या चौदाव्या वित्त आयोगाच्या वितरित निधीतून ग्रामपंचायतींनी ग्रामपंचायत विकास आराखडयानुसार कामे व उपक्रमांची प्रभावी अंमलबजावणी करावयाची असून यासंदर्भातील सूचना ग्राम विकास विभागाकडून संदर्भाधीन दि.३१ ऑगस्ट, २०१६ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आलेल्या आहेत. या मार्गदर्शक सूचना सन २०१९-२० या आर्थिक वर्षात वितरीत केलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबत देखिल लागू राहतील. त्याप्रमाणे ग्रामपंचायत विकास आराखडयानुसार कामे करताना चौदाव्या वित्त आयोगाच्या ९०% निधीचा विनियोग ग्रामपंचायतींनी सार्वजनिक पायाभूत सुविधांच्या कामांसाठी खर्च करावयाचा असून १०% निधीचा विनियोग प्रशासकीय व तांत्रिक बाबींसाठी करावयाचा आहे.

७. वरील प्रक्रियेमध्ये गावातील सद्याच्या परिस्थितीचे विश्लेषण करून गावाच्या गरजांची निश्चिती करून **कामे ठरविण्याचा अधिकार ग्रामसभा व ग्रामपंचायतीला** आहेत. त्याकरीता ग्रामपंचायत विकास आराखडा तयार करण्यासाठी गावातील लोकप्रतिनिधी व इतर घटकांच्या क्षमताबांधणीमध्ये तसेच ग्रामसभेमध्ये चौदाव्या वित्त आयोगाच्या निधीतून खर्च करण्यासाठी प्राधान्यक्रम ठरविताना पिण्यासाठी सुरक्षित पाणीपुरवठा यांचे महत्व पटवून द्यावे.

८. ग्रामपंचायतींनी चौदाव्या वित्त आयोगांतर्गत खात्यातील व्यवहार ग्रामपंचायतीच्या नावाने सरपंच व ग्रामसेवक/ग्रामविकास अधिकारी यांच्या संयुक्त स्वाक्षरीने व्हावे.

९. ग्रामपंचायतींनी प्राप्त निधीपेक्षा जास्त खर्च करू नये व जास्तीचे आर्थिक दायित्व निर्माण करू नये.

१०. ग्रामपंचायत स्तरासाठी वरील वितरीत निधीतून होणारा खर्च “मागणी क्र एल-३, २५१५- इतर ग्रामीण विकास कार्यक्रम, १९८- ग्रामपंचायतीस सहाय्य (००) (०८) १४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार ग्रामपंचायतींना विविध विकास योजनांसाठी अनुदाने (जनरल बेसिक ग्रँट) (२५१५ २४७७), (योजनेतर) ३१-सहाय्यक अनुदाने” या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२० या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची टाकावा.

११. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांनी ह्या शासन निर्णयाच्या प्रती त्यांचे अधिनस्त सर्व जिल्हा परिषद/ पंचायत समिती/ ग्रामपंचायत स्तरावरील अधिकाऱ्यांना तात्काळ उपलब्ध करून द्याव्यात.

१२. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या संदर्भ क्र. ४५७/२०१९ वित्त आयोग कक्ष, दिनांक १८/११/२०१९ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट (www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक क्र. **२०१९११२२१५४३२१२१२०** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e73505a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2019.11.25 15:17:51 +05'30'

**( प्र. दे. जैन )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१)मा. राज्यपालांचे सचिव,
२)मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३)मा. मंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
४)मा. राज्यमंत्री (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव,
५) सर्व जिल्हा परिषदांचे मा. अध्यक्ष,
६) सर्व मा. विधानसभा व विधान परिषद सदस्य,
७)मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
८)महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई (पाच जादा प्रतींसह),
९)महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर (पाच जादा प्रतींसह),
१०)अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव, वित्त विभाग/नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११)सचिव (ग्रा.वि. व पं.रा.) यांचे स्वीय सहायक,
१२) सर्व विभागीय आयुक्त (महसूल), विभागीय आयुक्त कार्यालय,
१३) सर्व सह/उप सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग,
१४) सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
१५) संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी (यशदा), पुणे,
१६) संचालक, स्थानिक निधी लेखा, महाराष्ट्र राज्य, कोकण भवन, नवी मुंबई,
१७) सर्व मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद ,
१८) सर्व महसूल विभागाचे उप आयुक्त (विकास),
१९) सर्व जिल्हा परिषदांचे उपमुख्य कार्यकारी अधिकारी (पंचायत),
२०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
२१) गट विकास अधिकारी (सर्व) (संबंधित जिल्हा परिषदांच्या मुख्य कार्यकारी अधिकारी यांच्या मार्फत),
२२) वित्त विभाग (व्यय-१५/अर्थोपाय/वित्त आयोग कक्ष/अर्थसंकल्प- १७),
२३) ग्राम विकास व जलसंधारण विभाग (सर्व कार्यासने),
२४) निवड नस्ती (वित्त-४).

प्रपत्र- अ

जनरल बेसिक ग्रँट

वितरण आदेश क्र. २ क्र.चौविआ-२०१८/प्र.क्र.१४९ /वित्त-४ ,दिनांक २५/११/२०१९ चे विवरणपत्र

(रू.हजारात)

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण रक्कम |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १ | ठाणे | २९२६७५ |
| २ | पालघर | ४७६९३८ |
| ३ | रायगड | ५११०७१ |
| ४ | रत्नागिरी | ४३०८९५ |
| ५ | सिंधुदूर्ग | २४१२६६ |
| ६ | नाशिक | १०८०२३६ |
| ७ | धुळे | ४६०३९७ |
| ८ | नंदूरबार | ४२२६७८ |
| ९ | जळगाव | ८८३७३६ |
| १० | अहमदनगर | ११२४३८३ |
| ११ | पुणे | ११२५९६४ |
| १२ | सातारा | ७४६६०४ |
| १३ | सांगली | ६४२०८५ |
| १४ | सोलापूर | ९११५५८ |
| १५ | कोल्हापूर | ७८९६५१ |
| १६ | औरंगाबाद | ६४६६७१ |
| १७ | जालना | ४९२१४७ |
| १८ | परभणी | ३९४०६९ |
| १९ | हिंगोली | ३१०५६५ |
| २० | बीड | ६४८७३६ |
| २१ | नांदेड | ७५२२९२ |
| २२ | उस्मानाबाद | ४३४०५७ |
| २३ | लातूर | ५५८२४७ |
| २४ | बुलढाणा | ६३२३६८ |
| २५ | अकोला | ३४२६७४ |
| २६ | वाशिम | ३०७२०३ |

| अ.क्र. | जिल्हा परिषदेचे नाव | एकूण रक्कम |
|---|---|---|
| २७ | अमरावती | ५९५८५५ |
| २८ | यवतमाळ | ६९५९४८ |
| २९ | वर्धा | २८६०७३ |
| ३० | नागपूर | ४७४१३७ |
| ३१ | भंडारा | २९६७५६ |
| ३२ | गोंदिया | ३४०७२६ |
| ३३ | चंद्रपूर | ४७२३२४ |
| ३४ | गडचिरोली | ३५९४६५ |
| | एकूण | १९१८०४५० |

PRAVIN DEVICHAND JAIN

Digitally signed by PRAVIN DEVICHAND JAIN
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=c7f82404d3bf725fa292c76bb1649f4e73505a8c846f3f83bdee9968a87f1d6c, postalCode=400001, street=MANTRALAYA,MUMBAI, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAVIN DEVICHAND JAIN
Date: 2019.11.25 15:19:05 +05'30'

(प्र. दे. जैन)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

## प्रपत्र-ब

प्रमाणित करण्यात येते की, १४ व्या वित्त आयोगांतर्गत सन -----------या वर्षाचा जनरल बेसिक ग्रँटचा शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र.----------------, दि.--------अन्वये जिल्हा परिषद स्तरावर प्राप्त सर्व निधी ---------(संबंधित जिल्हा परिषदेचे नाव) या जिल्हा परिषदेच्या अधिनस्त सर्व ग्रामपंचायतींना (----ग्रामपंचायतींची संख्या) शासनाच्या मार्गदर्शक सूचना तसेच विहित केलेल्या निकषानुसार इलेक्ट्रॉनिक प्रणालीद्वारे वितरीत करण्यात आला आहे.

सही:
नाव:
दिनांक:
(मुख्य लेखा व वित्त अधिकारी)
जिल्हा परिषद ---------

सही:
नाव:
दिनांक:
(मुख्य कार्यकारी अधिकारी)
जिल्हा परिषद ---------